शासकीय व निम-शासकीय सेवेत आरक्षित पदांवर मागासवर्गीयांची भरती करण्याबाबत सरळ सेवा भरतीचा अनुशेष भरुन काढण्यासाठी खास प्रयत्न.
विशिष्ट आणि तांत्रिक पदे यासाठी लागणारे प्रशिक्षण --

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : बीसीसी-१०८९/प्र.क्र.२२१/८९/१६-ब,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० नोव्हेंबर,२००१

वाचा :- १. शासकीय परिपत्रक समक्रमांक दिनांक १२ जुलै,१९८९
२. शासकीय परिपत्रक समक्रमांक दिनांक ११ ऑगस्ट,१९८९
३. शासकीय परिपत्रक समक्रमांक दिनांक ३० सप्टेंबर,१९८९
४. शासकीय शुध्दीपत्रक समक्रमांक दिनांक ५ ऑक्टोबर,१९८९
५. शासकीय परिपत्रक समक्रमांक दिनांक ६ नोव्हेंबर,१९८९.

**शासन परिपत्रक :**

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १२ जुलै,१९८९ प्रमाणे मागासवर्गीयांचा सरळसेवा भरतीतील अनुशेष विशेष प्रयत्न करुन विहित कालावधीत भरुन काढण्याबाबत शासनाने आदेश दिले आहेत. तथापि या सूचनांचे पालन केले जात नसल्याचे निर्दशनास आल्यावरुन याबाबत पुन्हा सुचना देण्यात येत आहेत.

२. शासन स्तरावर अनुशेष भरुन काढण्याच्या कार्यवाहीचा आढावा घेतांना असे निदर्शनास आले आहे की, वर्ग ३ च्या काही विशिष्ट आणि तांत्रिक पदांसाठी प्रशिक्षित उमेदवार सहजगत्या उपलब्ध होत नाहीत आणि त्यामुळे अनुशेषाची पदे भरण्यास विविध नियुक्ती अधिकाऱ्यांना अडचणी येत आहेत. (उदाहरणार्थ ही विशिष्ट पदे म्हणजे परिचारिका, शिक्षक, वाहनचालक, तारतंत्री, शेती सहाय्यक इ.) शासनाने याबाबत आता असा निर्णय घेतला आहे की या संबंधी प्रत्येक विभागाने आढावा घेऊन आवश्यकतेनुसार विहित अर्हता प्राप्त नसलेल्या मागासवर्गीय उमेदवारांना सेवा प्रवेश नियमातील अर्हता प्राप्त करण्यासाठी प्रशिक्षण देण्याची व्यवस्था करावी आणि अनुशेषाच्या जागेवर तसेच यापुढे उपलब्ध होणाऱ्या आरक्षित जागेवर प्रशिक्षित उमेदवार उपलब्ध करुन घ्यावेत.

३. अनुशेषाची पदे भरण्यात ज्या शैक्षणिक संस्था, महामंडळे, नगरपालिका, महानगरपालिका, शासकीय उपक्रम, सहकारी संस्था, सहकारी बँका इ. यांनी कुचराई केली

GR 200404081519410010100 कृ.मा.प.

G.R.20.11.2001

एच- ८६३ (५०००-१२-०१) १.

असेल आणि हेतुपूर्वक आरक्षित पदे भरली नसतील तर अशा संस्थांना देण्यात येणारे अनुदान व इतर सवलती रोखण्यासंबंधी शासनाला कार्यवाही करावी लागेल. ही बाब शासन अशा संस्थांच्या मुद्दाम निदर्शनास आणून देत आहे. तरी अनुशेष त्वरेने भरुन काढण्यासाठी संबंधितांनी योग्य ती खबरदारी घ्यावी. सर्व मंत्रालयीन विभागांनी या सूचना त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या विभागांना ही परिस्थिती पुन्हा निदर्शनास आणून द्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शैला तारगे पाटील
सह सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
अध्यक्ष, सर्व जिल्हा निवड समिती कार्यालये,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
संचालक, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी प्रकल्प
सर्व जिल्हा सेवायोजन अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील इतर सर्व विभागप्रमुख/ कार्यालय प्रमुख,
* पत्राने.

---

G.R.20.11.2001

प्रत - ८६३ (५०००-१२-०१) अ.